सन २०१० मध्ये झालेल्या अवेळी पाऊस व गारपीटीमुळे बाधित शेतकऱ्यांना अर्थसहाय्य देण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-एससीवाय-०६/२०१५/प्र.क.८६/म-११,**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक:-०६ ऑक्टोबर, २०१५.

वाचा:- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.सीएलएस-२०१४/प्र.क्र.३१७/म-३, दि.१८.६.२०१५,

२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एससीवाय-०५/२०१५/प्र.क्र.५५/म-११, दि.२५.५.२०१५,

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एससीवाय-०३/२०१५/प्र.क्र.३६/म-११, दि.२०.८.२०१५,

**प्रस्तावना :-**

परभणी जिल्हयातील गंगाखेड तालुक्यातील ५ गावांमध्ये दि.१४.२.२०१० रोजी गारपिटीमुळे २७७.०९ हेक्टर क्षेत्रावरील शेतीपिकांचे ५०% पेक्षा अधिक नुकसान झालेले आहे. नुकसान झालेल्या ५६१ खातेदारांना अदयापपर्यंत काही तांत्रिक कारणास्तव मदत देण्यात आली नव्हती. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयानुसार स्थायी दरानुसार कोरडवाहू पिकांसाठी रु.२०००/- प्रति हेक्टर व आश्वासित सिंचन क्षेत्राखाली पिकांसाठी रु.४०००/- प्रति हेक्टर प्रमाणे एकूण रु.५.६४ लाख निधीचे वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

परभणी जिल्ह्यातील गंगाखेड तालुक्यामधील ५ गावांमध्ये दि.१४.२.२०१० रोजी झालेल्या गारपीटीमुळे एकूण २७७.०९ हेक्टर क्षेत्रावरील शेतीपिकांचे ५०% पेक्षा अधिक नुकसान झाले आहे. नुकसान झालेल्या ५६१ खातेदारांना काही तांत्रिक कारणास्तव अदयापपर्यंत मदत देण्यात आली नव्हती. सदर बाधित शेतकऱ्यांना स्थायी दरानुसार कोरडवाहू पिकांसाठी रु.२०००/- प्रति हेक्टर व आश्वासित सिंचन क्षेत्राखालील पिकांसाठी प्रति हेक्टर इतक्या नुकसानीकरिता एकूण रु.५,६४,०००/- (अक्षरी रुपये पाच लाख चौसष्ठ हजार फक्त) इतक्या निधीसाठी या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१५-१६ या चालू वित्तीय वर्षामध्ये **मागणी क्र.सी-६, “२२४५, नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर चक्रीवादळे इत्यादी, १०१ अनुग्रह सहाय्य, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०५) पीक नुकसानीमुळे शेतकऱ्यांना मदत, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ २४५२)”** या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधी मधून रुपये ५,६४,०००/- (रुपये पाच लाख चौसष्ठ हजार फक्त) इतका निधी भागविण्यात यावा.

३. सदर मदत ही संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयाच्या आधारे, प्रत्येक बाधितास २ हेक्टर क्षेत्रापर्यंत मर्यादित असेल व बाधितास कमीतकमी रु.२५०/- इतकी मदत अनुज्ञेय राहील.

४. या निधीचे वाटप अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना करण्यात येत आहे. निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी खातरजमा करावी. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, याबाबतची माहिती विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी या विभागाकडे मासिक खर्चाच्या अहवाला सोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेख, अभिलेखे/नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे पत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत विभागीय आयुक्त यांनी एकत्रित महसूल व वन विभागास (कार्यासन म-११) न चुकता सादर करावी. झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी व हा खर्च तात्काळ करण्यात यावा. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

५. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार /उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण/उपशिर्षाच्या “संगणक यंत्र” संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत. तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.३१९/२०१५/व्यय-९, दि.१७.८.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००९१४०८१८७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chaaya Kiran Wadte

Digitally signed by Chaaya Kiran Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chaaya Kiran Wadte
Date: 2015.10.09 14:10:56 +05'30'

(छा. कि. वडते)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद,
३) आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४) संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) जिल्हाधिकारी, परभणी,
६) जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी,
७) महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण),महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर (प्रत्येकी ३ प्रती).
८) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/अर्थसंकल्प-६/व्यय-९/अर्थोपाय कक्ष/वित्त आयोग कक्ष), मंत्रालय, मुंबई,
१०) कार्यासन अधिकारी (ब-१/म-३/म-७/पीएसी कार्यासने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) निवडनस्ती, कार्यासन म-११.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित:-**

१) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.